**महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगास वेतनेत्तर बाबीकरिता सन २०२१-२२ या आर्थिक वर्षातील माहे जुलै, २०२१ ते सप्टेंबर, २०२१ या तीन महिन्यांकरिता निधी वितरीत करणेबाबत ...**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :-राअआ-२०२१/प्र.क्र.३५/का-९**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : १२ ऑक्टोंबर, २०२१.

वाचा :-

(१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं- २०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३,दि.६ एप्रिल,२०२१.
(२) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, राअआ-२०२१/प्र.क्र.३५/का९, दि.१८.०६.२०२१
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं- २०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४ जून, २०२१
४) महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाचे पत्र क्र.राअआ/लेखा/प्र.क्र.०२/का-४/२०२१-२२ दि. ०९/०८/२०२१ चे पत्र व सहपत्रे.

**प्रस्तावना -**

महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयास कार्यालयीन खर्चाकरिता सन २०२१-२२ या आर्थिक वर्षातील एकूण अर्थसंकल्पीत निधीच्या १५ टक्के वेतनेत्तर अनुदान कार्यालयीन खर्च भागविण्याकरिता मंजूर निधीतून वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयासाठी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षामध्ये "२२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम (०१) (१६) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २४९ (अनिवार्य), ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर)" या लेखाशिर्षातर्गत एकूण रु.४३,८०,०००/- (अक्षरी रूपये त्रेचाळीस लाख ऐंशी हजार फक्त) इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे.-

२. उपरोक्त संदर्भ क्र. (१) येथील वित्त विभागाच्या शासन परिपत्रकान्वये सन २०२१-२२ च्या प्रथम तीन महिन्यांकरीता एप्रिल, २०२१ ते जुन २०२१ या कालावधीकरीता अर्थसंकल्पीय तरतुदीच्या १०% म्हणजेच रु.४,३८,०००/- (अक्षरी रुपये चार लाख अडोतीस हजार फक्त) एवढा निधी उपलब्ध असून, सदर (बीम्स) प्रणालीद्वारे मंत्रालयीन विभागांना अनुदान वितरित करण्यास मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे. त्यास अनुसरुन महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयासाठी प्रथम तीन महिन्यांकरीता (एप्रिल २०२१ ते जून, २०२१) अर्थसंकल्पीय तरतुदीच्या १०% म्हणजेच रु.४,३८,०००/- (अक्षरी रुपये चार लाख अडोतीस हजार फक्त) एवढे वेतनेत्तर अनुदान वित्त विभागाने मान्यतेने संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये वितरित करण्यात आले आहे.

३. सन २०२०-२०२१ या आर्थिक वर्षामध्ये या लेखाशीर्षाखाली वितरीत केलेल्या निधीपैकी खर्च झालेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र व प्रत्यार्पित केलेल्या अनुदानाची चलनाची पावती आयोगाने शासनास सादर केले आहे. वित्त विभागाच्या शासन परिपत्रक दि.६ एप्रिल, २०२१ अन्वये माहे जुलै २०२१ ते सप्टेंबर २०२१ या तीन महिन्याच्या कालावधीकरिता **अर्थसंकल्पीय तरतुदीच्या १५% म्हणजेच रु.६,५७,०००/- (अक्षरी रुपये सहा लाख सत्तावन्न हजार फक्त)** इतके अनुदान, ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या उद्दिष्टाखाली खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत आहे.

| अ. क्र. | तपशीलवार लेखाशीर्ष | सन २०२१-२२ साठी अर्थसंकल्पीय अंदाज पुस्तिकेत दर्शविण्यात आलेले अनुदान (रु.) | तीन महिन्यासाठी उपलब्ध करुन दिलेले अनुदान (माहे एप्रिल, २०२१ ते माहे जुन, २०२१) (अर्थसंकल्पीय तरतुदीच्या १०%) (रु.) | तीन महिन्यासाठी मंजूर अनुदान (माहे जुलै, २०२१ ते माहे सप्टेंबर, २०२१) (अर्थसंकल्पीय तरतुदीच्या १५%) (रु.) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ४ |
| १ | ३१,सहायक अनुदाने (वेतनेतर) | ४३,८०,०००/- | ४,३८,०००/- | ६,५७,०००/- |
| | **एकूण** | ४३,८०,०००/- | ४,३८,०००/- | ६,५७,०००/- |
| | | **(एकूण अक्षरी रुपये सहा लाख सत्तावन्न हजार फक्त)** | | |

४. सदर तरतुद सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत असून याकरिता, अवर सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग हे आहरण व संवितरण आणि नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील. महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाने सन २०२१-२२ च्या मासिक निधी विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे आयोगाच्या कार्यालयाच्या खर्च विहित मर्यादेत राहील याची दक्षता घेण्यात यावी.

या आदेशान्वये वितरीत करण्यात आलेल्या निधीतून केलेल्या खर्चाचा तपशील, उपयोगिता प्रमाणपत्र Utilization Certification शासनांस सादर करणे तसेच संदर्भ क्र.(१) मधील वित्त विभागाच्या शासन परिपत्रकान्वये विहीत अटी व तरतुदींचे काटेकोरपणे पालन महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांनी करावे.

५. उपरोक्त निधी "मागणी क्र. झेडई -१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम (०१) (१६) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २४९ (अनिवार्य), ३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२८३/२०२१/व्यय-१, दि.२०.०९.२०२१ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. "सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग पहिला, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दि. १७ एप्रिल,२०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत किंवा त्या-त्या विभागास वेळोवेळी वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-२ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४ जून, २०२१ मधील अटीं शर्तीची पुर्तता होत असून, प्राप्त मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे."

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११०१२१५२४०१९८१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

DINESH MADHAVRAO SONAVANE

Digitally signed by DINESH MADHAVRAO SONAVANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITY DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9cabb099fd0576208f4caa310d2e7860201ab5363a2133e0927ff26c0f016fdf, pseudonym=1F9A10571D88646ED6CD168DADBFEDACC3DD2F35, serialNumber=6ADB2BDBBD3BD651A8ADE806B6E4AEA66DAA5512EA788889AF1515751ABC0181, cn=DINESH MADHAVRAO SONAVANE
Date: 2021.10.12 15:29:06 +05'30'

**( दि.मा.सोनवणे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई
२. महालेखापाल-१ (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
५. अवर सचिव, ( व्यय-४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२
६. कक्ष अधिकारी, (का-७) , अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२
७. निवडनस्ती (कार्यासन-९).